**सन २०२३-२४ या वर्षामध्ये राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत नेत्र विभागाचे श्रेणी वर्धनाकरिता मोतिबिंदू शस्त्रक्रियासाठी शासकिय रुग्णालयामध्ये आधुनिक फेको उपचार पध्दती सुरु करण्यासाठी आवश्यक उपकरणे व साहित्य सामुग्री खरेदीकरीता निधी वितरीत करण्याबाबत....**
**लेखाशिर्ष २२१००१६४, सहायक अनुदाने-३१ (वेतनेत्तर)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः पुरमा-१४२३/प्र.क्र.१४५/आरोग्य-८**
१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १२ मार्च, २०२४

वाचा :-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, (असंसर्गजन्य रोग ),मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/अंनिका/कक्ष-८ अ/ निधी वितरण/२०५५-६२/२३, दिनांक २८.०७.२०२३
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, (असंसर्गजन्य रोग ),मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/अंनिका/कक्ष-८ अ/ त्रुटींची पुर्तता/शुध्दीपत्रक/१९६५-७१/२४, दिनांक ०६.०३.२०२४
३) शासन शुध्दीपत्रक, सा.आ.विभाग, क्र.पुरमा-१४२३/प्र.क्र.१४५/आरोग्य-८ दि.०८.०२.२०२४
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४ जानेवारी, २०२४

**शासन शुध्दीपत्रक :-**

संदर्भीय दिनांक २४ जानेवारी, २०२४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.५ नंतर **परिच्छेद क्र.५(अ)** खालील प्रमाणे वाचावा :-

"५ (अ) वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी कळविले असून, त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(ब) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहे.

(क) सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत लाभार्थ्यांच्या/पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

(ड) सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी प्राधिकरणाच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

(इ) सदर अनुदान "सशर्त" असून यापुर्वी शासनाकडुन वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता, त्याच प्रयोजनासाठी करण्यात येणार असल्याचे सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रमाणित केले आहे. तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल."

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१६४८२७३३१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.12 17:23:43 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा, (असंसर्गजन्य रोग ),मुंबई
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
८) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
९) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)